मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथील मुळ याचिका क्र.५६३/२०१५ आदर्श शिक्षण प्रसारक मंडळ, धाराशिव (उस्मानाबाद) विरुद्ध महाराष्ट्र शासन यावर मा. न्यायालयाने दि.२१.०२.२०१९ रोजी दिलेल्या निर्णयानुसार संस्थेच्या श्रीपतराव भोसले हायस्कूल, धाराशिव (उस्मानाबाद) या माध्यमिक शाळेच्या ३७ विना अनुदानित तुकड्यांवरील ५६ शिक्षकांचे जून २०२१ पूर्वीचे वेतन अनुदान मंजूर करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
शासन निर्णय क्रमांक : न्यायाप्र-२०२१/प्र.क्र.१२७/एसएम-४
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : -११ जुलै, २०२४.

वाचा:-

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. माशाअ-१००३/(५१६/०३)/माशि-१, दिनांक १७ फेब्रुवारी,२००४.
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.माशाअ-२००९/(५९९/०९)/माशि-१, दिनांक २० जुलै,२००९.
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.माशाअ-२००९/(५९९/०९)/माशि-१, दिनांक १५ नोव्हेंबर, २०११.
४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक:संकीर्ण-२०१२/(१५०/१२)/माशि-१, दिनांक १६ जुलै २०१३.
५) शिक्षणाधिकारी ( माध्यमिक), जिल्हा परिषद उस्मानाबाद यांचे पत्र,जा.क्र. जिपउ /शिक्षण/ मावि-३/२०१३/१९५, दि.०८ ऑक्टोबर, २०१३.
६) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.माशान्या-१५१४/(७०/२०१४)/ एसएम-४, दिनांक ३० एप्रिल, २०१४.
७) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.माशान्या-१५१४/(७०/२०१४)/एसएम-४, दिनांक ०७ एप्रिल, २०१६
८) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. माशामु-२०१६/ प्र.क्र.१८/एसएम-४, दिनांक १९ सप्टेंबर, २०१६
९) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. न्यायाप्र- २०१८/(१५४/२०१८)/एसएम-४, दिनांक ०६ फेब्रुवारी, २०१९
१०) मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथील रिट याचिका क्र.५६३/२०१५ मध्ये मा. उच्च न्यायालयाने दिनांक २१ फेब्रुवारी २०१९ रोजी दिलेला निर्णय.
११) विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर यांचे पत्र क्र. शिउसं/ला/मावि-२/२०१८-१९/२९८६, दिनांक २२ जुलै, २०१९

१२) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) म.रा. पुणे यांचे पत्र क्र.अमाशा/आ.शि.सं./२०१९/माध्य-ब/३०४/५०५८, दिनांक २६ जुलै, २०१९
१३) शासन पत्र, क्र. न्यायाप्र-२०१८/प्र.क्र.१५४/एसएम-४, दिनांक २८ डिसेंबर २०२०.
१४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, समक्रमांक, शासन निर्णय, दिनांक १४ जानेवारी, २०२२, शुध्दीपत्रक, दिनांक २५ जानेवारी, २०२२ व शुध्दीपत्रक, दिनांक ०९ ऑक्टोंबर, २०२३
१५) शिक्षणाधिकारी ( माध्यमिक), जिल्हा परिषद धाराशिव (उस्मानाबाद) यांचे पत्र,जा.क्र. जिपउ /शिक्षण/ मावि-८/१०४९-५२/२०२३, दि.२८ जून, २०२३.

**प्रस्तावना:-**

आदर्श शिक्षण प्रसारक मंडळ, धाराशिव (उस्मानाबाद) यांनी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्र. ५६३/२०१५ मध्ये मा. न्यायालयाने दिनांक २१.०२.२०१९ रोजी पुढीलप्रमाणे आदेश पारित केले आहेत :-

(i) The petition is allowed.

(ii) As per the proposal made by the Education Officer in his letter dated 08.10.2013 the Government is to give the grant in aid to the school of petitioner in respect of the additional divisions sanctioned from the academic year 2003-04.

(iii) The grant in aid is to be given only in respect of teaching staff actually appointed after following due procedure and not in respect of the vacant posts.

(iv) it is to be ascertained that no appointment was given to open category candidate as against the posts which was available to reserved category candidate and if that is done by the institution, grants in respect of that post are not to be given.

(v) Amount already given is to be adjusted accordingly and for the remaining amount the management will be responsible to the staff.

(vi) The process of ascertaining that proper procedure was followed, is to be completed with six months.

Civil Application is disposed of

Rule is made absolute in those terms.

२. मा. उच्च न्यायालयाच्या उक्त आदेशाच्या विरोधात शासनाने मा. सर्वोच्च न्यायालय नवी दिल्ली येथे स्पेशल लिव्ह पिटिशन (सिव्हिल) डायरी नंबर (S)-१०२९०/२०२० दाखल केली होती.

मा. सर्वोच्च न्यायालयाने दिनांक ०१.१०.२०२० रोजी उक्त स्पेशल लिव्ह पिटिशन फेटाळलेले आहे.

३. मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांचे दिनांक २१.०२.२०१९ चे आदेशानुसार अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय मुंबई यांचे आदेश क्र. न्यायाप्र- २०१८/ प्र.क्र.१५४/एसएम-४, दिनांक २८.१२.२०२० अन्वये संस्था अध्यक्ष/शाळेच्या मुख्याध्यापक यांना अर्धन्यायिक स्वरूपातील निर्णय कळविलेला आहे.

४. त्यानंतर, शासनाने मा. सर्वोच्च न्यायालय नवी दिल्ली येथे रिव्हिव्ह (review) पिटिशन (c) D.NO. 24798/2020 (in special leave petition (c) D. NO.10290/20) दाखल केले होते. सदर रिव्हिव्ह पिटिशनवर मा. सर्वोच्च न्यायालयात दिनांक २७.०१.२०२१ रोजी सुनावणी होऊन, रिव्हिव्ह पिटीशन फेटाळले आहे. तसेच उपरोक्त Review Petition फेटाळताना असेही स्पष्ट केले आहे की, “It is a gross case. However, we would not like to give our imprimatur to the legal proposition in question.”

५. मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल रिट याचिका क्र.५६३/२०१५ मध्ये मा.न्यायालयाने दिनांक २१.०२.२०२१ च्या आदेशाप्रमाणे कार्यवाही न झाल्याने याचिकाकर्त्या संस्थेने मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे अवमान याचिका क्र. ७५०/२०१९ दाखल केली असून सद्य:स्थितीत उक्त अवमान याचिका न्यायप्रविष्ठ आहे.

६. आदर्श शिक्षण प्रसारक मंडळ, धाराशिव (उस्मानाबाद) यांनी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्र. ५६३/२०१५ मध्ये मा. न्यायालयाने संदर्भ क्र. (१०) येथील दिनांक २१.०२.२०१९ रोजी दिलेल्या निर्णयास अनुसरुन शासनाने संदर्भ क्र. (१४) येथील दिनांक १४ जानेवारी, २०२२ च्या शासन निर्णयान्वये आदर्श शिक्षण प्रसारक मंडळ, धाराशिव (उस्मानाबाद) या संस्थेच्या श्रीपतराव भोसले हायस्कूल, धाराशिव (उस्मानाबाद) या शाळेच्या ३७ विना अनुदानित तुकड्यावरील ५६ शिक्षकांना वित्त विभागाच्या सहमतीने विहित अटी व शर्तीच्या अधीनतेने दिनांक ०१.०६.२०२१ पासून १०० टक्के वेतन अनुदान मंजूर केले आहे.

७. मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ यांच्या दिनांक २१.०२.२०१९ रोजीच्या आदेशातील परिच्छेद क्र. (iv) मध्ये it is to be ascertained that no appointment was given to open category candidate as against the posts which was available to reserved category candidate and if that is done by the institution, grants in respect of that post are not to be given, असे आदेशित केले आहे.

त्यानुषंगाने विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर यांनी संदर्भ क्र.(११) येथील दिनांक २२.०७.२०१९ रोजीच्या पत्रान्वये व शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) म.रा. पुणे यांनी संदर्भ क्र.(१२) येथील दिनांक २६.०७.२०१९ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या

अहवालानुसार सदर ३७ विनाअनुदानित तुकड्यांवरील कार्यरत खुल्या प्रवर्गातील शिक्षकांच्या नियुक्त्या खुल्या प्रवर्गासाठी असलेल्या बिंदुवर झाल्याचे नमूद केलेले आहे.

०८. तसेच मा. उच्च न्यायालयाने दिनांक २१.०२.२०१९ रोजीच्या आदेशातील परिच्छेद क्र. (ii) मध्ये As per the proposal made by the Education Officer in his letter dated 08.10.2013 the Government is to give the grant in aid to the school of petitioner in respect of the additional divisions sanctioned from the academic year 2003-04 असे आदेशित केले आहे.

मा. उच्च न्यायालयाच्या उपरोक्त आदेशानुसार, संदर्भ क्र. (५) नुसार शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, धाराशिव (उस्मानाबाद) यांनी दिनांक ०८.१०.२०१३ रोजी शासनास सादर केलेल्या प्रस्तावानुसार, सदर संस्थेस शासन निर्णय, दिनांक १४.०७.२००० मधील तरतुदीनुसार तुकडयांच्या वयानुसार देय होणारा अनुदान टप्पा देणेबाबत आदेशित केले आहे. मा. उच्च न्यायालयाच्या उक्त आदेशानुसार ३७ विनाअनुदानित तुकड्यावरील कार्यरत शिक्षकांना देय असणारे वेतनाबाबत शासनस्तरावरुन उचित आदेश होण्याची विनंती संदर्भ क्र. (१५) येथील दिनांक २८.०६.२०२३ च्या पत्रान्वये शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, धाराशिव (उस्मानाबाद) यांनी शासनास केली आहे.

०९. मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांचे उपरोक्त आदेश विचारात घेऊन, आदर्श शिक्षण प्रसारक मंडळ, धाराशिव (उस्मानाबाद) संचलित श्रीपतराव भोसले हायस्कूल, धाराशिव (उस्मानाबाद) या शाळेच्या ५६ शिक्षकांची नियुक्ती ही सन २०१५-२०१६ च्या पुर्वीची असल्याने, तसेच, मा. उच्च न्यायालय यांनी उक्त दिनांक २१.०२.२०१९ रोजीच्या आदेशात शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जिल्हा परिषद, धाराशिव (उस्मानाबाद) यांच्या दिनांक ०८.१०.२०१३ रोजीच्या प्रस्तावानुसार अनुदान देण्याचे आदेश दिलेले असल्याने, प्रस्तुत प्रकरणी आदर्श शिक्षण प्रसारक मंडळ, धाराशिव (उस्मानाबाद) संचलित श्रीपतराव भोसले हायस्कूल, धाराशिव (उस्मानाबाद) या माध्यमिक शाळेच्या ३७ विनाअनुदानित तुकड्यांवरील ५६ शिक्षकांना शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जिल्हा परिषद, धाराशिव (उस्मानाबाद) यांच्या दिनांक ०८.१०.२०१३ रोजीच्या प्रस्तावानुसार तुकडयांच्या वयानुसार जून-२०२१ पुर्वीचे टप्पा वेतन अनुदान मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केलेले विवेचन विचारात घेता, मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक ५६३/२०१५ मध्ये मा. न्यायालयाने दिनांक २१.०२.२०१९ रोजी दिलेल्या निर्णयानुसार, आदर्श शिक्षण प्रसारक मंडळ, धाराशिव (उस्मानाबाद) संचलित श्रीपतराव भोसले हायस्कुल, धाराशिव (उस्मानाबाद) या शाळेतील ३७ विनाअनुदानित तुकड्या व त्यावरील ५६ शिक्षक पदांना मा. उच्च न्यायालयाच्या उपरोक्त आदेशानुसार, संदर्भ क्र.

(५) अन्वये शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, धाराशिव (उस्मानाबाद) यांनी दिनांक ०८.१०.२०१३ च्या पत्रानुसार शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने, सदर संस्थेच्या श्रीपतराव भोसले हायस्कुल, धाराशिव (उस्मानाबाद) या शाळेस, शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार शासन निर्णय, क्र. माजातु-३०००/(३०३/२०००)/माशि-१, दिनांक १४.०७.२००० मधील तरतुदीनुसार तुकडयांच्या वयानुसार देय होणारा अनुदान टप्पा मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. आदर्श शिक्षण प्रसारक मंडळ, धाराशिव (उस्मानाबाद) संचलित श्रीपतराव भोसले हायस्कुल, उस्मानाबाद या शाळेतील ३७ विनाअनुदानित तुकड्या व त्यावरील ५६ शिक्षक पदांना खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून अनुज्ञेय टप्पानुसार अनुदान मंजूर करण्यात येत आहे :-

१) संदर्भ क्र. (३) येथील शासन निर्णय, दिनांक १५.११.२०११ व त्यानंतरच्या शासन निर्णयानुसार शाळांना अनुदानासाठी पात्र घोषित करण्यासाठी अनुशेष धोरणाचे पालन करणे आवश्यक राहील. मागासवर्गीयांचा अनुशेष पुर्ण भरण्याबाबत विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर यांनी शाळेकडून बंधपत्र घ्यावे.
२) उक्त संस्थेने मागासवर्गीयांचा अनुशेष आगामी काळात पवित्र पोर्टल मार्फत होणाऱ्या भरती प्रक्रीयेनुसार व विहित कार्यपध्दतीनुसार भरावा.
३) उक्त संस्थेने आगामी काळात मागासवर्गीयाचा अनुशेष विहित कार्यपध्दतीने न भरल्यास, उक्त संस्थेचे वेतन अनुदान बंद करण्याबाबतची कार्यवाही विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर यांच्याकडून करण्यात येईल.
४) यापूर्वी राजीनामा दिलेल्या उक्त संस्थेतील शिक्षकांना पुन्हा आरक्षित पदांवर नियुक्ती देणे उचित होणार नाही. त्यामुळे अशी नियुक्ती होणार नाही, याबाबत संस्थेने दक्षता घ्यावी. तसेच, उक्त संस्थेस वेतन अनुदान वितरीत करताना देखील संबंधित प्राधिकारी यांनी याबाबतची दक्षता घ्यावी.
५) संस्थेस अनुदान वितरीत करताना शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीची पूर्तता करीत असल्याची खात्री संबंधित प्राधिकारी यांनी करावी.

३. संदर्भ क्र. (१४) येथील शासन निर्णय, दिनांक १४.०१.२०२२ मधील अट क्र. (५) नुसार सदर संस्थेच्या शाळेतील शिक्षकांना दिनांक ०१.०६.२०१२ ते दिनांक २८.०२.२०१५ या कालावधीत नियमानुसार अनुज्ञेय नसताना अदा केलेल्या टप्पानिहाय अतिरिक्त वेतनाची रक्कम समायोजित करण्याचे निर्देशित करण्यात आले आहे. आता, मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ यांच्या आदेशानुसार संदर्भ क्र. (५) येथील पत्रान्वये शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, धाराशिव (उस्मानाबाद) यांनी दिनांक ०८.१०.२०१३ अन्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने तुकडीच्या वयानुसार टप्पा अनुदानानुसार अनुदान मंजूर करण्यास शासनाने मान्यता दिल्याने, यापूर्वीच्या संदर्भ क्र.(१४) येथील शासन निर्णय, दिनांक १४.०१.२०२२ मधील अट क्र. (५) स्थगित करण्यात येत आहे.

त्यामुळे संदर्भ क्र. (१४) येथील शासन निर्णयातील अट क्र. (५) नुसार समायोजित करण्यात आलेली रक्कम संस्थेच्या शाळेस अनुज्ञेय ठरत आहे. यास्तव सदर रक्कम संस्थेच्या शाळेतील संबंधित शिक्षकांना अदा करण्याबाबत शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जि.प. धाराशिव यांच्यामार्फत स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात यावी. तसेच, अशी कार्यवाही करताना अतिरिक्त रक्कमेचे प्रदान होणार नाही याची देखील दक्षता घेण्यात यावी.

४. मा. उच्च न्यायालयाच्या निर्णयानुसार आदर्श शिक्षण प्रसारक मंडळ, धाराशिव (उस्मानाबाद) संचलित श्रीपतराव भोसले हायस्कुल, उस्मानाबाद या शाळेतील ३७ विनाअनुदानित तुकड्या व त्यावरील ५६ शिक्षक पदांना तुकडीच्या वयानुसार टप्पा निहाय वेतन अनुदान म्हणून रु.२५,४०,९०,६७०/- ( रुपये पंचवीस कोटी चाळीस लक्ष नव्वद हजार सहाशे सत्तर फक्त ) इतके वेतन अनुदान अनुज्ञेय होत आहे. सदर वेतन अनुदान संस्थेच्या शाळेतील उक्त कालावधीत कार्यरत शिक्षकांना अदा करण्यात यावे.

५. यावर होणारा खर्च मागणी क्र. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ११०-अशासकीय माध्यमिक शाळांना व कनिष्ठ महाविद्यालयांना सहाय्य, (००)(०१) सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान (अनिवार्य), ३६, सहायक अनुदाने (वेतन)(२२०२ ०४४२) या लेखाशिर्षाखाली चालू आर्थिक वर्षासाठी मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३७७/व्यय-५, दिनांक ०८.०४.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०७१११५०९३४८१२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

VIVEK GULABRAO SAPKAL

Digitally signed by VIVEK GULABRAO SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=55c54ce6c9bede7daecd096d20450a76c60783cb1318374f8764a2da64d548a5,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=50EDF35541F970C25C79ED803C981C8C9EBC19E27CDBAD124BB5C63AA9962A6B, cn=VIVEK GULABRAO SAPKAL
Date: 2024.07.11 16:20:28 +05'30'

**( विवेक सपकाळ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई.
२) मा. उपमुख्यमंत्री ( वित्त व नियोजन ) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री ( गृह ) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव ( वित्त विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव (व्यय) यांचे स्वीय सहाय्यक वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

८) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.

९) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) म.रा. पुणे.

१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र , १/२ मुंबई/नागपूर .

११) महालेखापाल (लेखापरीक्षा ) महाराष्ट्र , १/२ मुंबई/नागपूर.

१२) महालेखापाल (स्थायिक निकाल लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर.

१३) स्थानिक निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

१४) विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर.

१५) शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, धाराशीव .

१६) अधिक्षक वेतन पथक (माध्यमिक), जिल्हा परिषद, धाराशीव.

१७) निवड नस्ती, एसएम-४.

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, क्र. न्यायाप्र-२०२१/प्र.क्र.१२७/एसएम-४, दिनांक ११ जुलै, २०२४ चे विवरणपत्र**

आदर्श शिक्षण प्रसारक मंडळ, धाराशिव (उस्मानाबाद) संचालित श्रीपतराव भोसले हायस्कूल, धाराशिव (उस्मानाबाद) या शाळेच्या मंजूर तुकड्यांना शासन निर्णय, दिनांक १४.०७.२००० मधील तरतूदीनुसार तुकडीच्या वयानुसार टप्पा अनुदान मंजूर करण्याबाबत

| अ.क्र. | तुकडी मंजूरीचे वर्ष | आदेश क्रमांक व दिनांक | इयत्ता | तुकडी क्रमांक | अनुदान देय होणारे वर्ष व टप्पा | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | २००६-०७ | २००७-०८ | २००८-०९ | २००९-१० | २०१०-११ | २०११-१२ | २०१२-१३ | २०१३-१४ |
| १ | २००२-०३ | पत्र क्र.नमाशा/१००४/६६१/ ०४/ मा.शि.०१, दि.--जून २००५ | ५ वी | ८ | २०% | ४०% | ६०% | ८०% | १००% | | | |
| २ | २००३-०४ | पत्र क्र.नमाशा/१००४/६६१/०४/ मा.शि.०१, दि.--जून २००५ | ६ वी | ८ | ---- | २०% | ४०% | ६०% | ८०% | १००% | | |
| | | पत्र क्र.माशातु-१००७/(७२३/०७)/ मा.शि.०१, दि.२०.१२.२००७ | ९ वी | १३ | | | | | | | | |
| | | | १० वी | ११ | | | | | | | | |
| ३ | २००४-०५ | पत्र क्र.माशातु-१००७/(७२३/ ०७)/मा.शि.-०१, दि.२०.१२.२००७ | १० वी | १२ | ----- | ----- | २०% | ४०% | ६०% | ८०% | १००% | |
| ४ | २००५-०६ | पत्र क्र.माशातु-२००९/(२४८/ ०९)/ मा.शि.-०६, दि.२९.०८.२००९ | ५ वी | ९,१० | ----- | ---- | ---- | २०% | ४०% | ६०% | ८०% | १००% |
| | | | ६ वी | ९,१०,११,१२ | | | | | | | | |
| | | | ७ वी | ९,१० | | | | | | | | |
| | | | ८ वी | १४,१५,१६ | | | | | | | | |
| | | | ९ वी | १४,१५ | | | | | | | | |
| ५ | २००६-०७ | पत्र क्र.माशातु-२००९/(२४८/ ०९)/मा.शि.-०६, दि.२९.०८.२००९ | ५ वी | ११ | ----- | ----- | ----- | ----- | २०% | ४०% | ६०% | ८०% |
| | | | ७ वी | ११ | | | | | | | | |
| | | | ८ वी | १७ | | | | | | | | |
| | | | ९ वी | १६,१७ | | | | | | | | |
| | | पत्र क्र.माशातु-१००७/(७२३/ ०७)/ मा.शि.-०१, दि.२०.१२.२००७ | १० वी | १३ | | | | | | | | |

| | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | पत्र क्र.माशातु-२००९/(२४८/०९)/ मा.शि.-०६, दि.२९.०८.२००९ | १० वी | १४ | | | | | | | | |
| ६ | २००७-०८ | पत्र क्र.माशातु-२००९/(२४८/०९) / मा.शि.-०६, दि.२९.०८.२००९ | ५ वी | १२,१३ | ----- | ----- | ----- | ----- | ------ | २०% | ४०% | ६०% |
| | | | ६ वी | १३ | | | | | | | | |
| | | | ७ वी | १२,१३,१४ | | | | | | | | |
| | | | ८ वी | १८,१९ | | | | | | | | |
| | | | ९ वी | १८ | | | | | | | | |
| | | | १० वी | १५,१६,१७ | | | | | | | | |

उपरोक्त विवरणपत्रातील अ.क्र. (५) मधील ७ तुकड्यांना शासन निर्णय, दिनांक १४.०७.२००० मधील तरतुदीनुसार तुकडयांच्या वयानुसार सन २०१४-२०१५ मध्ये १००% वेतन अनुदान अनुज्ञेय होईल. तसेच अ.क्र.(६) मधील १२ तुकड्यांना सन २०१४-२०१५ मध्ये ८०% व सन २०१५-२०१६ मध्ये १००% वेतन अनुदान अनुज्ञेय होईल.

VIVEK GULABRAO SAPKAL

Digitally signed by VIVEK GULABRAO SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=55c54ce6c9bede7daecd096d20450a76c60783cb1318374f8764a2da64d548a5,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=50EDF35541F970C25C79ED803C981C8C9EBC19E27CDBAD124BB5C63AA9962A6B, cn=VIVEK GULABRAO SAPKAL
Date: 2024.07.11 16:20:42 +05'30'

**( विवेक सपकाळ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**